**टंचाई परिस्थितीत टँकर्सचे अधिकार तहसीलदार यांना प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसुल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- एससीवाय- २०१४/ प्र.क्र.२५८/म-७**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक :- ३१ जानेवारी, २०१५

**<u>प्रस्तावना :-</u>**

राज्यात झालेल्या कमी पर्जन्यमानामुळे टंचाई सदृश्य परिस्थिती निर्माण झालेली आहे. सन २०१४ च्या खरीप हंगामात ५० पैशांपेक्षा कमी आणेवारी आलेल्या राज्यातील २३८११ गावांमध्ये टंचाई सदृश्य परिस्थिती लागू करण्यात आलेली आहे. त्यानुसार विविध उपाययोजना लागू करण्यात आलेल्या आहेत. सध्या पिण्याच्या पाण्याचे टँकर्स पुरविण्याचा अधिकार जिल्हाधिकारी यांना आहे. राज्यातील टंचाई सदृश्य परिस्थिती व पाण्याची निकड विचारात घेता टँकर्स पुरविण्याबाबतचे जिल्हाधिकारी यांना असलेले अधिकार संबंधित तहसीलदार यांना प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

टंचाई सदृश्य परिस्थिती व पिण्याच्या पाण्याची निकड विचारात घेऊन टँकर्स पुरविण्याचे जिल्हाधिकारी यांना असलेले अधिकार आवश्यकतेनुसार विहीत कालावधीसाठी संबंधित तहसीलदार यांना प्रदान करण्यासाठी विभागीय आयुक्तांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०१३११५२३१६१६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

Suresh Shankarrao Bokade

Digitally signed by Suresh Shankarrao Bokade
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Suresh Shankarrao Bokade
Date: 2015.01.31 15:39:48 +05'30'

**(सुरेश शं.बोकडे)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) सर्व विभागीय आयुक्त

२) सर्व जिल्हाधिकारी

३) सर्व मुख्य अधिकारी, महसुली विभाग

४) सर्व कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद

५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

६) सर्व कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद / पांटबंधारे विभाग/ सार्वजनिक बांधकाम विभाग

७) सदस्य सचिव, महाराष्ट्र पाणी पुरवठा व जलनिस्सारण मंडळ, मुंबई.

८) सर्व मुख्य अभियंता, ग्रामीण / नागरी पाणी पुरवठा

९) सर्व मंत्रालयीन विभाग.

१०) महालेखापाल१/२,(लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य , मुंबई / नागपुर

११) महालेखापाल १/२,(लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य मुंबई/ नागपुर

१२) वित्त विभाग (अर्थसंकल्प-६/व्यय-९) मंत्रालय, मुंबई.

१३) अवर सचिव (म-३/म-११) महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

१४) कार्यासन अधिकारी (पापु-१४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई

१५) निवड नस्ती , कार्यासन म-७, महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

**प्रत माहितीसाठी अग्रेषित :-**

१) मा.मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

२) मा.राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

३) सचिव (मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.